गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सावानिमित्त शेगाव क्षेत्रात मुलभूत सुविधा निर्माण करण्याचा विकास आराखडा.
आराखड्यातील कामांना मुदतवाढ देण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
### शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०१२/प्र.क्र.२४/का.१४४४

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-३२
तारीख: २९ ऑक्टोबर, २०१४

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवी-२००९/प्र.क्र.८०/का.१४४४ दि. ८ मार्च, २०१०**
२) **शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवी-२००९/प्र.क्र.८०/का.१४४४ दि. ५ मे, २०११**
३) **शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवी-२०१२/प्र.क्र.१८/का.१४४४ दि. १९ मे,२०१२**

**प्रस्तावना -**

श्री गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवानिमीत्त श्रीक्षेत्र शेगाव, जिल्हा बुलढाणा येथे मुलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी उक्त शासन निर्णय दिनांक १९ मे, २०१२ नुसार आराखड्यातील कामांस सन २०१२-१३ व सन २०१३-१४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर आराखडयातील कामांमध्ये झालेल्या नैसर्गिक भाववाढीस तसेच काही नवीन कामांना व त्यानुषंगाने आराखडयाच्या मुदतवाढीस मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील शिखर समितीने मान्यता दिली आहे. त्यानुसार या आराखड्यातील कामे पूर्ण करण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय-

श्री गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवानिमीत्त श्रीक्षेत्र शेगाव, जिल्हा बुलढाणा येथे मुलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी उक्त शासन निर्णय दिनांक १९ मे, २०१२ नुसार आराखड्यातील कामांस सन २०१२-१३ व सन २०१३-१४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आतापर्यंत झालेल्या कामांच्या प्रगतीचा विचार करता तसेच नवीन कामांचा समावेश विचारात घेता, पूर्वी निश्चित केलेल्या कालावधीत ही कामे पुर्ण करणे शक्य नसल्याने आराखड्यातील कामे पूर्ण करण्यास जून, २०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०२९१६४२४२९३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hemant Vithal Malandkar

Digitally signed by Hemant Vithal Malandkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Hemant Vithal Malandkar
Date: 2014.10.29 17:10:07 +05'30'

**हे.वि.मालंडकर**
सह सचिव

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री
२. मा. उपमुख्यमंत्री
३. मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन)
४. मा. पालकमंत्री, बुलढाणा
५. शेगाव क्षेत्रातील संबंधित विधानसभा सदस्य
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, मुंबई.
८. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
९. जिल्हाधिकारी, बुलढाणा
१०.वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
१२.मुख्याधिकारी, शेगाव नगर परीषद, शेगाव
१३. नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती, का. १४४४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.